राज्य उत्पादन शुल्क विभागातील दुय्यम निरीक्षक (गट-क) संवर्गातून निरीक्षक (गट-ब) या संवर्गात पदोन्नती.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः- इएसटी-१७२१/प्र.क्र.१५६/ राउशु-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०४ मार्च, २०२२.

**संदर्भ** :- शासन आदेश, समक्रमांक, दि.१३.१२.२०२१.

**शासन आदेश-**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील दुय्यम निरीक्षक (गट-क) या संवर्गातून निरीक्षक (गट-ब) या संवर्गात पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०२०-२१ च्या पदोन्नतीसूचीमधील खालील अधिकाऱ्यांना निरीक्षक (गट-ब) या संवर्गात पदोन्नती देण्यात येत असून सदर पदोन्नतीनंतर, त्यांची त्यांच्या नावासमोर (स्तंभ ४ येथे) दर्शविण्यात आलेल्या महसूली विभागामध्ये (स्तंभ ५ येथे) दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूल विभाग | पदोन्नतीनंतर देण्यात येणारी पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. एस. डी. खरात | अ.जा. | पुणे | सातारा (शहर) |
| २. | श्री. एस. एन. देशमुख | इमाव | अमरावती | अचलपूर, जि.अमरावती |

२. सदर पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) सदर पदोन्नती, निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत, याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात, मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सा.प्र.वि./१६-ब यांच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार देण्यात येत आहे. तसेच, दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका स्टँप ६८१९/२०२१ मध्ये दि.०८.०७.२०२१ व दि.२२.०७.२०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या स्वरूपातील पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमितपणाचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

५) निवडसूचीतील अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु / प्रस्तावित नाही.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

४. सदर आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. सदर पदोन्नतीमुळे रिक्त झालेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार देण्याबाबतची कार्यवाही संबंधित विभागीय उप आयुक्त, राउशु यांनी करावी व तसे शासनास कळवावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०४१७१९३७७३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandeep Gorakhnath Dhakane

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, cn=Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2022.03.04 17:21:34 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई व नागपूर.
३) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
४) संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७) संबंधित निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (आयुक्त, राउशु यांचेमार्फत)
८) कार्यासन अधिकारी, राउशु-२ व ३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.